१० फेब्रुवारी १९८८ रोजी एक दिवसाच्या लाक्षणिक संपात भाग घेऊन अनुपस्थित राहिलेल्या शासकीय कर्मचा-यांबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक: एसटीके-१०८८/सीआर-५/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ७ एप्रिल, १९८८.

वाचा:- शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:एसटीके-१०८८/सीआर-५/१६-अ, दिनांक ५ फेब्रुवारी १९८८.

शासन निर्णय :- सरकारी/निमसरकारी कर्मचारी आणि शिक्षक संघटना, महाराष्ट्र राज्य, यांच्या समन्वय समितीने कर्मचा-यांना दिनांक १० फेब्रुवारी १९८८ पासून बेमुदत संपाचे आवाहन केले होते. तथापि बेमुदत संप मागे घेण्यात आला व दिनांक १० फेब्रुवारी १९८८ रोजी एक दिवसाचा लाक्षणिक संप करण्यात आला. त्या संपात भाग घेऊन जे शासकीय कर्मचारी दिनांक १० फेब्रुवारी १९८८ रोजी कामावर अनुपस्थित होते त्यांची अनुपस्थिती कशी नियमित करावी असा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. शासन आता असा आदेश देत आहे की, दिनांक १० फेब्रुवारी १९८८ रोजी अनुपस्थित असलेल्या कर्मचा-यांपैकी जे कर्मचारी त्या दिवसाच्या अनुपस्थितीसाठी ज्या देय व अनुज्ञेय रजेची मागणी करतील ती रजा त्यांना द्यावी व इतरांच्या बाबतीत त्या दिवसाची अनुपस्थिती महाराष्ट्र नागरी सेवा [रजा नियम] १९८१ च्या नियम ६३ प्रमाणे असाधारण रजा [extra ordinary leave] देऊन नियमित करण्यात यावी. मात्र

कृ. मा. प.

असाधारण रजेवर असताना अनुज्ञेय असलेले भत्ते[स्थानिक पूरक भत्ता व घरभाडे भत्ता]त्यांना देण्यात यावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

र. शं. दिक्षित,

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
शासनाचे सर्व सचिव,
*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
*प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
महालेखापाल, लेखा व हक्कदारी, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, लेखा व हक्कदारी, महाराष्ट्र-२, नागपूर,
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई / अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त, / सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई, / सर्व कोषागार अधिकारी,
मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व इतर विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवड फाईल.

---- *पत्राने.